ई- साहित्य प्रकाशन

१६ मार्च, २००९ (अंक १८)

नेटाक्षरी

# महफिल - ए - गझल





**या अंकात वाचा –**



***संपादक***

सोनाली घाटपांडे ( पुणे )

***अतिथी संपादक***

ज्ञानेश पाटील ( जळगाव )

नीरज कुलकर्णी ( नाशिक )

***सह संपादक***

स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

अहं ब्रह्मास्मी ( पुणे )

रेणूका रेपाळ (अमेरिका )

सुरुची नाईक ( नागपूर )

आनंद माने ( सोलापूर )

नाम गुम जायेगा ( ठाणे )

सचिन काकडे ( मुंबई )

**“मराठी गझल”** ज्यांच्या उल्लेखाशिवाय अपूर्ण आहे त्या गझलसम्राट सुरेश भटांना आमची मानवंदना !!!!!



**लाभले आम्हास भाग्य आम्ही बोलतो मराठी**

**जाहलो खरेच धन्य ऐकतो मराठी**

**धर्म, पंथ, जात एक जाणतो मराठी**

**एवढ्या जगात माय मानतो मराठी**

**- सुरेश भट**

गझलसम्राट सुरेश भटांचा जन्म अमरावती येथे १५ एप्रिल १९३२ रोजी झाला. मराठी कवितांचे आईकडून मिळालेले बाळकडू त्यांची काव्य-प्रतिभा फुलवतचं गेले . त्यांचा प्रथम काव्यसंग्रह ‘रूपगंधा’१९६१ मध्ये प्रकाशित झाला. १९७४ साली त्यांचा ‘रंग माझा वेगळा’ हा काव्यसंग्रह प्रकाशित झाला. १९८३ मध्ये त्यांनी स्वतः ‘एल्गार’ नावाचा काव्यसंग्रह प्रकाशित केला. त्यांचे याशिवाय ‘झंझावात’, ‘सप्तरंग’ हे ही काव्यसंग्रह प्रकशित आहेत . तसेच ह्या काव्यसंग्रहांना विविध पारितोषिकेही लाभली आहेत. शिवाय ते अनेक विद्यापिठांच्या अभ्यासक्रमातही समाविष्ट आहेत. भटांच्या कविता या मराठी गझल म्हणूनच मान्य पावल्या. त्यांनी अनेक गीते व कविता यांचेही लेखन केले.

“एखादा होतकरू गझलकार आढळला तर मला लॉटरी लागल्यासारखा आनंद होतो ” असे म्हणणारे हे कवी आपले सारे आयुष्य कवितेसाठी , गझलेसाठीच जगले असणार हे नक्की .

**रूपगंधा**

मलमली तारूण्य माझे , तू पहाटे पांघरावे
मोकळ्या केसात माझ्या, तू जीवाला गुंतवावे
लागूनी थंडी गुलाबी , शिरशिरी यावी अशी
राजसा माझ्यात तू अन मी तुझ्यामाजी भिनावे
काप-या माझ्या तनूची तार झंकारून जावी
रेशमी संगीत स्पर्शाचे , तू पुन्हा पेटवावे
रे तुला बाहूत माझ्या, रूपगंधा जाग यावी
मी तुला जागे करावे, तू मला बिलगून जावे

‘विजा घेऊन येणा-या पिढ्यांशी बोलतो आम्ही’ सांगणारे हे कवी नवकवी आणि त्यांच्या कवितांवर अतोनात माया करत.

मनात निरागसपणा दडलेला, कमालीचा पारदर्शक, प्रामाणिक आणि गझलेवर निरातिशय प्रेम करणारा असा हा साध्यासुध्या माणासांचा साधासुधा कवी होता.

## एल्गार

अद्यापही सु-याला माझा सराव नाही।
अद्यापही पुरेसा हा खोल घाव नाही।

येथे पिसून माझे काळीज बैसलो मी
आता भल्याभल्यांच्या हातात डाव नाही।

हे दुःख राजवर्खी... ते दुःख मोरपंखी...
जे जन्मजात दुःखी त्यांचा निभाव नाही।

त्यांना कसे विचारु - कोठे पहाट गेली?
त्यांच्यापल्याड त्यांची कोठेच धाव नाही।

जी काल पेटली ती वस्ती मुजोर होती...
गावात सज्जनांच्या आता तणाव नाही।

झाले कुठे फरारी संतप्त राजबिंडे?
कोठेच आसवांचा बाका बनाव नाही।

गर्दीत गारद्यांच्या सामील रामशास्त्री...
मेल्याविना मढ्याला आता उपाय नाही।

जावे कुण्या ठिकाणी उध्वस्त पापियांनी?
संतांतही घराच्या राखेस भाव नाही।

उच्चारणार नाही कोणीच शापवाणी...
तैसा ऋषीमुनींचा लेखी ठराव नाही।

साध्याच माणसांचा एल्गार येत आहे...
हा थोर गांडुळांचा भोंदू जमाव नाही।

ओठी तुझ्या न आले अद्याप नाव माझे...
अन ओठ शोधण्याचा माझा स्वभाव नाही।

## रंगुनी रंगात सा-या......

रंगुनी रंगात सा-या रंग माझा वेगळा।
गुंतुनी गुंत्यात सा-या पाय माझा मोकळा।

कोण जाणे कोठुनी या सावल्या आल्या पुढे?
मी असा की लागती या सावल्यांच्याही झळा।

राहती माझ्यासवे ही आसवे गीतांपरी
हे कशाचे दुःख ज्याला लागला माझा लळा।

कोणत्या काळी कळेना मी जगाया लागलो
अन कुठे आयुष्य गेले कापुनी माझा गळा?

सांगती तात्पर्य माझे सारख्या खोट्या दिशा
चालणारा पांगळा अन पाहणारा आंधळा।

माणसांच्या मध्यरात्री हिंडणारा सूर्य मी
माझियासाठी न माझा पेटण्याचा सोहळा



**आतिथी संपादकाच्या लेखणीतून** - ज्ञानेश पाटील

मराठीत किंबहुना एकूणच काव्यात 'गझल' हा वैशिष्ठ्यपूर्ण काव्यप्रकार आहे. इतर कुठल्याही काव्यप्रकारापेक्षा वृत्तांची, मात्रांची यमक आणि अंत्य यमकांची अशी असंख्य बंधने यात आहेत. मात्र कोंदणामुळे हि-याला शोभा यावी तसे या बंधनातच या काव्यप्रकाराचे सौंदर्य लपलेले आहे. गझलेची खरी ताकत असते ती म्हणजे तिचा 'शेर' अर्थात द्विपदीच्या स्वरूपातील मांडणी. एकाच वृत्तातल्या दोन ओळीत सगळा आशय व्यक्त करता येणे, ही असते शेराची खासियत.

साधारणपणे पहिल्या ओळीत आकर्षकपणे विषय मांडला जाणे आणि दुस-या ओळीत केलेला प्रभावी समारोप अशी शेराची मांडणी केली जाते. सुरेश भटांचा एक शेर हे उदाहरण अधिक स्पष्ट करेल –

पाहिजे पूजेस त्यांना प्रेत माझे,<br>
मी जगाया लागलो...... चुकलेच माझे !

मूळची उर्दू, पण आता मराठीसह अन्य भाषामध्ये रूजलेली ही गझल, मराठीत सर्वप्रथम आणण्याचे श्रेय दिले जाते कवी माधव ज्युलियन यांना. त्यांनी गझलेच्या फॉर्ममध्ये काही भावगीते लिहिली आहेत. पण ज्याला खरीखुरी गझल म्हणता येईल अशी रचना सर्वप्रथम मराठीत आणली, रूजवली, जोपासली आणि वाढवली ती कवी सुरेश भट यांनीच.

सुरेश भटांनी ग़झलेचा फॉर्म तर वापरलाच, मात्र त्याचबरोबर तिची नजाकत, ठेका, दोन ओळीत आशय सामावण्याचे सामर्थ्य ही वैशिष्ठ्येही मराठीत आणली. गझलेची चळवळ त्यांनी घराघरातच नाही तर मनामनात नेली. रसिकांनी सुरेश भटांच्या कवितेला अक्षरशः डोक्यावर घेतले. मात्र त्यांनी तेथेच न थांबता ठिकठिकाणच्या उदयोन्मुख शायरांना मार्गदर्शन करून नव्या गझलकारांची एक संपूर्ण पिढी घडवण्याचे काम केले. यालोकोत्तर कामामुळेच त्यांना 'गझल सम्राट' ही पदवी बहाल करण्यात आली. अर्थात हा प्रवास इतका सोपा नव्हता. ज्याप्रमाणे कोणत्याही नविन गोष्टीला विरोध होतो त्याप्रमाणे तो गझलेला ही झाला . अनेक प्रतिथयश साहित्यीकांनी गझलेच्या सामर्थ्याबद्दल शंका उत्पन्न केल्या, टीका केली एका साहित्य संमेलनात तर मराठी कवितेवर गझलेचे आक्रमण हा परिसंवाद ठेवला गेला. भट मात्र या सर्वाला पुरून उरले . नियतीने दिलेला प्रत्येक घाव झेलूनही सुरेश भट नामक झंझावात गझलरूपी अमृताचे रोपटे जोपासत राहिला.

आज गझल मराठी भाषेत रूजली आहे, लोकप्रिय झाली आहे, नवनवे शायर मराठी गझलेला पुढे नेत आहेत .<br>
हे सर्व पहायला जरी भट हयात नसले तरी त्यांचा स्वर्गस्थ आत्मा नक्की कृतार्थतेने म्हणत असेल ----

"जाणते ही बाग माझ्या सोसण्याच्या सार्थकाला,<br>
मी इथे अमृताचे रोपटे रूजवून गेलो !!!"

# गझलेची स्पंदने

## प्रार्थना

गंजल्या ओठांस माझ्या धार वज्राची मिळू दे।
आंधळ्या आत्म्यात माझ्या सूर्य सत्याचा जळू दे

पांगळा बंदिस्त माझा जन्म आकाशून जावो,
वादळी आवेग माझा चार भिंतींना कळू दे;

सारखे सौंदर्य माझ्या कोरड्या गात्री खळाळो,
सारखे अस्तित्व माझे पेटतांना दरवळू दे।

लाभू दे लाचार छाया मोठमोठ्यांना परंतु,
तापल्या मातीत माझ्या घाम मानाने गळू दे।

आणु दे गा वंचकांना क्रूस छद्माचा दयाळा,
रक्त येशूचे परी डोळ्यात माझ्या साकळू दे।

## एक साधा प्रश्न माझा

एक साधा प्रश्न माझा, लाख येती उत्तरे।
हे खरे की ते खरे की ते खरे की ते खरे?

कारणावाचून माझा शोध घेती कारणे।
अन कुणा ठावे मला मी विस्मरे किंवा स्मरे?

भोवताली हिंडती ही माणसे प्रेतांपरी;
काय ह्या गावातसुद्धा एकदा होती घरे?

जाळुनी आयुष्य माझे वाट मी तेजाळली;
फक्त माझे पोट आता जाळण्यासाठी उरे।

दूर आलो एवढा की थांबल्या मागे दिशा...
माझियासंगे उद्याची चालती संवत्सरे।

ह्याच आता शेष माझ्या राहिल्या काही खुणा,
दोन माझी आसवे अन चार माझी अक्षरे।

## अजून काही......

तुझ्या नभाला गडे किनारे अजून काही।
तिथेच जाऊन वेच तारे अजून काही।

जरी सुखाच्या निवांत दारास मी नकोसा,
खुल्या व्यथांची सताड दारे अजून काही।

तसा न रस्त्यात आज धोका मला, परंतु-
घरांत येतात वाटमारे अजून काही।

गडे मला सांग तूच माझी तुझी वदंता,
विचारते गाव हे बिचारे अजून काही।

तुम्ही कुठे आमच्या दिशा बंदिवान केल्या?
सणाणती बंडखोर वारे अजून काही।

थकून गेलो तरी फुलांचा सुरुच हेका-
अजून गा रे... अजून गा रे... अजून काही।

करु नका एवढ्यात चर्चा पराभवाची...
रणात आहेत झुंजणारे अजून काही।

विझून माझी चिता युगे लोटली तरीही,
विझायचे राहिले निखारे अजून काही।



# कवितांची साथ

## व्यर्थ

सूर मागू तुला मी कसा ?
जीवना तू तसा, मी असा !

तू  मला , मी तुला पाहीले,
एकमेकांस न्याहाळिले ,
दुःख माझातुझा आरसा !

एकदाही मनासारखा
तू न झालास माझा सखा
खेळलो खेळ झाला जसा  !

खूप झाले तुझे बोलणे
खूप झाले तुझे कोपणे
मी तरीही जसाच्यातसा !

रंग सारे तुझे झेलूनी
शाप सारे तुझे घेऊनी
हिंड्तो मीच वेडापिसा !

काय मागून काही मिळे ?
का तुला बात माझे कळे ?
व्यर्थ हा अमृताचा वसा

## रंग खेळतो हरी

आज गोकुळात रंग खेळतो हरी
राधिके, जरा जपून जा तुझ्या घरी

तो चटोर चित्तचोर वाट रोखतो
हात ओढूनी खुशाल रंग टाकतो
रंगवूनी रंगूनी गुलाल फासतो
सांगते अजूनही तुला परोपरी

सांग श्यामसुंदरास काय जाहले
रंग टाकल्याविना कुणा न सोडले
ज्यास त्यास रंग रंग रंग लागले
एकटीच वाचशील काय तू तरी

त्या तिथे अनंगरंग रास रंगला
गोपगोपिकांसवे मुकुंद दंगला
तो पहा मृदुंग मंजि-यात वाजला
हाय वाजली फिरून तिच बासरी !



## लोचनांनो !

लोचनांनो, एवढे अश्रू तुम्ही ढाळू नका रे,
आटुनी जाईल ओलावा , झरा सांडू नका रे

भावनांनी भोवताली घातला होता गराडा
काळजाला लागलेला घाव ओलावू नका रे

भान ठेवा, आसवे ही अंतरीची ठेव आहे
माझीया संवेदनेच्या या खुणा गाडू नका रे

खूप आले, खूप गेले, आसवे स्नेहीच माझे
एकटा राहू कसा ? सांगा तया जाऊ नका रे
दुःख होवो मोद अथवा, एक अश्रू सोबतीला
खाण माझी अंतरीची एवढी उधळू नका रे

- अरविंद चौधरी (सतस्वरूपी राम)

## जात माणसाची...

बदनाम जात आहे... विश्वात माणसाची...
उरतात फक्त पापे... पश्चात माणसाची...

जपलेत आज येथे... ह्रदयात भाव ज्यांनी...
त्यांची नसेल ओळख... वाह्यात माणसाची...

वरताण कोण आहे... त्याची करू गुलामी...
असलीच रीत आहे... तह्यात माणसाची...

वदनात तत्व आहे... नाहीच वागण्यात...
अधुरीच बात आहे... प्रख्यात माणसाची...

असणार आज आहे... त्यांच्यातलाच मीही...
मजला नकाच शिकवू ... दिनरात माणसाची...

- आनंद माने

## जागृती

अंधार कोंदलेला, सुरसाज रोधलेला
आली निशा भराला, बोभाट माजलेला!

लोकांस काय त्याचे, कोणी कसा जळाला?
त्याच्या घरी परंतु, गोंगाट चाललेला!

जाणून लोक-इच्छा घाली लगाम जो तो,
त्याच्याच भावनांचा बाजार मांडलेला!

रामेच नाही का हो केल्या अनेक संधी
त्याच्या निजी जिवाचा दरबार थाटलेला!

रोका अरे, खलांना; जागून सत्य जाणा,
माणूस आज होवो झुंजार, जागलेला!

आहे प्रभा तुम्हाला द्याया अनेक युक्ती,
त्या आत्मतेजसाचा हुंकार जागलेला!!

- प्रभा प्रभुदेसाई

## -----खर्डेघाशी -----

दिवसांवर दिवसांच्या राशी
जीवन म्हणजे खर्डेघाशी

फोडासम जपलेले शैशव
खपली धरते तळहाताशी

तुझ्या बटांशी खेळून जावे,
वा-याची इतकी बदमाशी ?

बांधू जेथे घरटे आपण
तिथेच मथुरा, तिथेच काशी

भुकेल्यांस भाकरी नसे अन
खाणारे खाऊन ऊपाशी

तुझ्याविना जगण्याची शिक्षा
हीच का मरेस्तोवर फाशी

जरी वादळे येती जाती
लाटांना भिडतात खलाशी

- चक्रपाणी

## सांग माझी कहाणी कधी !

सांग माझी कहाणी कधी
जाळलेली जवानी कधी ......

वाहलो आसवांनीच त्या
लाट आली तुफानी कधी ...!!

शोधले मी तुला खुपदा
दाविली तू निशाणी कधी ...?

जाणले रे मना मी आता
ती नसावी दिवाणी कधी ...!!

पेटली भावनांची चिंता
नेमकी ह्या ठिकाणी कधी ...??

देखण्या वेदनांची अभी
वाच यादी पुराणी कधी .....!!!

- अभिजीत नागले



## भाषा

अर्थ शब्दांचे कसे  नाही  म्हणावे
जे तुझे आहे कसे  नाही  म्हणावे

मी तुझ्यापाशी न आलो मागण्याला
लाभले जे ते कसे  नाही  म्हणावे

संपुनी गेला जरी सहवास आपुला
श्वास दरवळते कसे  नाही  म्हणावे

कोवळीशी भेट त्या कवळ्या क्षणांची
तन कवळले ते कसे  नाही  म्हणावे

कालची भाषा जरी वरवर समजली
खोलवर घुसले कसे  नाही  म्हणावे

गात आहे मी मनोमन गीत नामा
दाटले सारे कसे  नाही  म्हणावे

- नाम गुम जाएगा

## बरेच काही ...!

आठवशिल तर आठवेलसे बरेच काही
अजुनी आहे राहिले तसे बरेच काही...

मुठीत नाही आली स्वप्ने खंत कशाला,
ओंजळीतही मोहवेलसे बरेच काही...

क्षितीजापाशी सांज देऊनी गेली मजला,
निशा, चांदणे, गंध, कवडसे बरेच काही...

तुझे वचन स्वप्नी येण्याचे म्हणून निजतो
घडले आहे जागवेलसे बरेच काही...

जगता जगता नकळत पायी तुडवत गेलो
श्रद्धा, निष्ठा, प्रेम, भरवसे बरेच काही...

आज किनारी उरलेले वेचण्यास आलो
वचने, शपथा, पावले, ठसे बरेच काही ...!

- अभिजीत दाते



## अतिथी संपादकाची ओळख -

## ज्ञानेश पाटील



व्यवसायाने वैद्यकीय तज्ञ असणारा ज्ञानेश पाटील स्वतः बद्दल सांगताना म्हणतो -

मी गझलेकडे कसा वळालो याबद्दल सांगायचं झाल्यास, तसं काही ठरवून वगैरे नाही. लहानपणापासून कवितेची आवड होतीच. लिहीता येऊ लागले त्या काळापासून कविता लिहितो आहे वडील मराठी विषयाचे प्राध्यापक असल्यामुळे घरात पुस्तके भरपूर. त्यामुळे अनेक कवी वाचता आले. काही कविता कळल्या, काही कळल्या नाहीत; पण कवितेचे संस्कार होत होते. अशातच हळुहळु वृत्तबद्ध कविता जास्त आवडायला लागल्या. त्यातच कधीतरी गझलेचा फॉर्म हाताळला. काही गझल लिहील्या. पण ज्यावेळी या गझल लिहीत होतो, त्यावेळी गझल हा शब्दही मी ऐकलेला नव्हता. नंतर जेंव्हा गझल कळू लागली, तिचा अभ्यास करु लागलो, तेंव्हा लक्षात आले की आपण लिहीलेल्या अनेक कविता या खरे तर गझलच आहेत.

आता अशी परिस्थिती आहे, की साधी कविता लिहीताच येत नाही. प्रत्येक विचार गझलेचा शेर होऊनच सामोरा येतो. प्रत्येक कविता आपले वृत्त घेऊनच मनात प्रवेशते.

अद्याप माझ्या गझलांचे पुस्तक वगैरे प्रकाशित केलेले नाही. बहुसंख्य कविता इंटरनेटवरच प्रकाशित केलेल्या आहेत. तर काही वर्तमानपत्रातून प्रकाशित झालेल्या आहेत. भीमराव पांचाळ, चित्तरंजन भट, अनंत ढवळे, प्रदीप कुलकर्णी यांसारख्या दिग्गजांनी दिलेली शाबासकी आणि नेटवरील कवी मित्रांनी दिलेले प्रेम हेच मोठे पुरस्कार आहेत.
कविता चालूच आहेत पाहुया, काय होते ते!

### तुझे ठसे

पहा कधी ना कधी असेही घडेल काही
नसेन मी त्यामुळे तुझेही अडेल काही

तुझे ठसे चेहे-यात माझ्या नकोस शोधू
(मनात कोठेतरी तुला सापडेल काही)

कुठे असावा जुना जिव्हाळा ? कळेल तेही
तुला चांदणे बनून जेव्हा जडेल काही

अढी जराशी , ललाटरेषा बनून गेली,
मला भिती प्राक्तनास आता नडेल का ही ?

जुन्या स्मृतींनो ! मनात माझ्या हळूच या रे,
उठेल झोपेमधून आणि रडेल काही

सुखा, तुझे नेमके इरादे मला कळू दे
नको विचारू "व्यथा तुला आवडेल का ही ?"

लिहून टाका मनात जे जे असेल ते ते
खपेल काही, घरात थोडे पडेल काही

- ज्ञानेश पाटील

## निरज कुलकर्णी



जखमेस ओल आली...

एकांत रुक्ष माझा, फेटाळतो जरा मी...
गर्दीत माणसांच्या, रेंगाळतो जरा मी...

मज जिंकण्या मिळावा, का वाव ना कधीही?
नुसत्या पराभवाला कंटाळतो जरा मी...

डोळयांत साठलेली, स्वप्ने तहानलेली...
निद्रेस टाळताना, ओशाळतो जरा मी...

चौफेर गोठलेला, अंधार जीवघेणा...
आयुष्य शोधताना, ठेचाळतो जरा मी...

मधुमुक्त वागण्याचा, उलटून काळ गेला!
त्या रम्य आठवांना, कवटाळतो जरा मी...

तुज पाहूनी समोरी, जखमेस ओल आली...
स्वर्गीय वेदनांना, सांभाळतो जरा मी...

आभार यातनेचे, मानून मी जरासे;
आभास हे तुझे मग, परिमाळतो जरा मी...

- निरज कुलकर्णी

निरज कुलकर्णी जसा उत्तम हॉटेल मॅनेज करतो तशा त्याच्या गझलही परफेक्शन साधतात. गझलेबद्दल तो सांगतो -

कवितेची आवड हळूहळू गझलेकडे वळली आणि हळूहळू गझल कळू लागली, तिचा अभ्यास करु लागलो, तेंव्हा लक्षात आले की आपण लिहीलेल्या अनेक कविता या खरे तर गझलच आहेत. आता अशी परिस्थिती आहे, की साधी कविता लिहीताच येत नाही.

**हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..**

**netaksharee@gmail.com**